**पाणीपुरवठा योजनांवरील रुपांतरीत नियमित अस्थायी (सीआरटी) आस्थापनेवरील कार्यरत कर्मचाऱ्यांच्या सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील वेतनासाठी संबंधित जिल्हा परिषदांना निधी वितरीत करण्याबाबत.**
**लेखाशिर्ष २२१५१९१४**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२२/प्र.क्र.६४/पापु-२३**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीखः २३ मार्च, २०२३

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ४ एप्रिल,२०२२
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः जिपग्रा-११२०/प्र.क्र.१३५/पापु-२३, दिनांक ३० जानेवारी, २०२३
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ८ फेब्रुवारी,२०२३
४. शासनपत्र क्रमांकः बजेट-१४२२/प्र.क्र.६४/पापु-२३, दिनांक ३ फेब्रुवारी, २०२३

**प्रस्तावना:-**

जिल्हा परिषदेंतर्गत ग्रामीण पाणीपुरवठा योजनांवरील रुपातंरीत नियमित अस्थायी (सीआरटी) आस्थापनेवरील कार्यरत पात्र कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी शासनाकडून जिल्हा परिषदेला अनुदान देण्याचा धोरणात्मक निर्णय मंत्रीमंडळाने दिनांक १७ नोव्हेंबर, २०२२ च्या बैठकीमध्ये घेतला असून त्यानुषंगाने दिनांक ३० जानेवारी, २०२३ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सध्या कार्यरत असणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या मासिक वेतनाची कर्मचारी निहाय अचूक परिगणना करुन पुढील महिन्याच्या १ तारखेपासून, आवश्यक असणाऱ्या निधीची मागणी संबंधित जिल्हा परिषदांनी शासनाकडे करण्याच्या सूचना संदर्भाधीन शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत. त्यानुषंगाने जिल्हा परिषदांतर्गत कार्यरत कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी सन २०२२-२३ या अर्थिक वर्षात फेब्रुवारी, २०२३ या महिन्याकरीता जिल्हा परिषदेला शासनाकडून अनुदान अनुज्ञेय होत आहे. त्यानुषंगाने कार्यरत कर्मचाऱ्यांच्या या महिन्याच्या वेतनाची अचूक परिगणना

करुन कर्मचारीनिहाय सविस्तर तपशील शासनास सादर करण्याबाबत संदर्भाधीन दिनांक ३ फेब्रुवारी, २०२३ च्या पत्रान्वये कळविण्यात आले होते. ज्या जिल्हा परिषदांनी सदर माहिती अचूकरित्या सादर केली आहे, अशा जिल्हा परिषदांना संबंधित लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध निधी विचारात घेऊन संदर्भाधीन दिनांक ३० जानेवारी, २०२३ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट अ मध्ये नमूद कार्यरत कर्मचाऱ्यांच्या फेब्रुवारी, २०२३ या महिन्याच्या नियमित वेतनासाठी निधी वितरीत करण्याची बाब  वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणीपुरवठा विभागाच्या रुपांतरीत नियमित अस्थायी (सीआरटी) आस्थापनेवरील ज्या कार्यरत कर्मचाऱ्यांसाठी पूर्वलक्षी प्रभावाने पदे मंजूर करण्यास संदर्भाधीन दिनांक ३० जानेवारी, २०२३ च्या शासन निर्णयान्वये शासनाने मंजूरी दिली आहे, अशा कर्मचाऱ्यांच्या  फेब्रुवारी, २०२३ या महिन्याच्या नियमित वेतनासाठी पुढील जिल्हा परिषदांना २२१५१९१४  या लेखाशिर्षांतर्गत ३६, सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाखाली एकूण रुपये २१,७०,७०६/- (अक्षरी रुपये एकवीस लाख सत्तर हजार सातशे सहा फक्त )  इतके अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हा परिषद | कर्मचाऱ्यांची संख्या | या शासन निर्णयान्वये लेखाशिर्ष २२१५१९१४ खाली वितरीत करण्यात येत असलेले एकूण अनुदान | |
|---|---|---|---|---|
| | | | रुपये | (अक्षरी रुपये) |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | कोल्हापूर | ४ | १,७५,०००/- | रूपये एक लाख पंच्याहत्तर हजार फक्त |
| २ | सांगली | २२ | ११,४६,६७७/- | रूपये अकरा लाख सेहेचाळीस हजार सहाशे सत्त्याहत्तर फक्त |
| ३ | रत्नागिरी | १ | ५६,०३४/- | रूपये छपन्न हजार चौतीस फक्त |
| ४ | भंडारा | ७ | ३,१२,९१७/- | रूपये तीन लाख बारा हजार नऊशे सतरा फक्त |
| ५ | पालघर | १३ | ४,८०,१३२/- | रुपये चार लाख ऐंशी हजार एकशे बत्तीस फक्त |
| एकूण | | ४७ | २१,७०,७०६/- | रुपये एकवीस लाख सत्तर हजार सातशे सहा फक्त |

२. उपरोक्त वेतन अनुदान संदर्भाधीन दिनांक ३० जानेवारी, २०२३ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ठ "अ" मध्ये नमूद केलेल्या कर्मचाऱ्यांच्या माहे फेब्रुवारी, २०२३ च्या अनुज्ञेय वेतन/भत्त्यांसाठी मंजूर केले असून या निधीचा अन्य कारणांसाठी किंवा अन्य कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी उपयोग करणे, ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व त्याकरीता संबंधित जबाबदार अधिकारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र असतील.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी. तसेच झालेल्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाशी वेळोवेळी ताळमेळ घ्यावा. ताळमेळाचे काम प्रलंबित असल्यास पुढील निधी वितरीत करण्यात येणार नाही. शासनाद्वारे देण्यात येणारे अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

४. वितरीत केलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तींचे पालन करावे.

५. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेला खर्च "मागणी क्रमांक वाय-२, २२१५-पाणीपुरवठा व स्वच्छता, १९६-जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, (०१)- ग्रामीण नळ पाणीपुरवठा योजना, (०१)(०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (अनिवार्य) (२२१५१९१४), ३६- सहायक अनुदान (वेतन)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/ अर्थ-३, दिनांक ८ फेब्रुवारी, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात तसेच बीम्स प्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत. या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२३१८२२५३३०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB BABASAHEB HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, pseudonym=ECB735300543A776F1DE714D85AF521F7953EAF5, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2023.03.23 18:30:02 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर/सांगली/रत्नागिरी/पालघर/भंडारा.
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर/सांगली/रत्नागिरी/पालघर/भंडारा.
जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर/सांगली/रत्नागिरी/पालघर/भंडारा
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा, जिल्हा परिषद, कोल्हापूर/सांगली/रत्नागिरी/पालघर/भंडारा

प्रत: माहितीस्तव

मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
अप्पर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक
वित्त विभाग, व्यय-३/ अर्थसंकल्प-१८ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
ग्रामविकास विभाग, आस्था-१० कार्यासन, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, पापु-४/पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई.
निवडनस्ती, पापु-२३.